**सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात**
जागतिक बँक व ग्लोबल एन्व्हॉयरमेंट फॅसिलिटी
अर्थसहाय्यित नागरी वाहतूक सुधारणा प्रकल्पासाठी
**(Sustainable Urban Transport Project)**
पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेस कर्ज स्वरुपात
निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एसयुटी-२०११/प्रक्र-१४४/नवि-३३**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १२ मे,२०११.**

**संदर्भ:** केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाचे आदेश एफ क्र.-५३ (२)/पीएफ-१/२०१०-१५५६
दिनांक ३१ /०३/२०११.

**प्रस्तावना :-**

राज्यातील ठराविक शहरातील नागरी वाहतुक पध्दतीचा नियोजनबध्द पध्दतीने विकास करण्याकरिता केंद्र शासनामार्फत नागरी वाहतुक सुधारणा प्रकल्प (Sustainable Urban Transport Project) राबविण्यात येत आहे. या प्रकल्पाकरिता जागतिक बँकेकडून कर्ज व ग्लोबल एन्व्हॉयरमेंट फॅसिलिटी ( GEF) यांच्याकडून अनुदान स्थानिक स्वराज्य संस्थांना केंद्र शासनामार्फत उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. सदर योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील पुणे व पिंपरी-चिंचवड महानगरपालिकांची निवड झाली असून, पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेस जागतिक बँकेकडून कर्ज मिळण्याकरीता केंद्र शासन व जागतिक बँक यांच्यामध्ये करार झाला असून जागतिक बँक व राज्य शासन यांच्यामध्ये दिनांक ५ फेब्रुवारी,२०१० रोजी प्रकल्प राबविण्याकरीता करार करण्यात आला आहे. या अनुषंगाने जागतिक बँकेकडून केंद्र शासनास निधी प्राप्त झाला असून, केंद्र शासनाने सदर निधी राज्य शासनाकडे संदर्भाधिन आदेशान्वये सुपुर्द केला आहे. राज्य शासनाने संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेस निधी वितरित करावयाचा आहे. संदर्भाधिन केंद्र शासनाच्या आदेशान्वये रु.२३५.७० लक्ष इतकी **रक्कम कर्ज स्वरुपात** वितरित करण्यात आली असून सदर रक्कम पिंपरी -चिंचवड महानगरपालिकेस वितरित करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधिन होती. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

नागरी वाहतूक सुधारणा प्रकल्पाकरीता केंद्र शासनाने संदर्भाधिन आदेशान्वये वितरित केलेल्या रु २३५.७० लक्ष इतक्या कर्जाच्या रक्कमेचे वितरण पिंपरी -चिंचवड महानगरपालिकेस करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. **सदर रकमेचे वितरण कर्ज म्हणून करण्यात येत आहे.** त्यानुसार खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार निधी वितरीत करण्यासाठी मंजूरी देण्यात आली आहे आणि यासाठी **श्री. का. सु. सातकर,** उपसचिव, नगर विकास विभाग यांना **"नियंत्रण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे व **श्री.आ.रा. राजपूत,** कक्ष अधिकारी, नगरविकास विभाग यांना **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी **रुपये दोन कोटी,पस्तीस लाख, सत्तर हजार फक्त ( रु.२,३५,७०,०००/- फक्त )** इतक्या रकमेचा धनादेश आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे नांवाने काढावा व त्याचे वितरण पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेस करावे.

( रुपये लाखात )

| अ.क्र. | स्थानिक स्वराज्य संस्थेचे नांव | प्रकल्पाचे नांव | केंद्र शासनाकडून वितरित रक्कम |
|---|---|---|---|
| १ | पिंपरी-चिंचवड महानगरपालिका | नागरी वाहतुक सुधारणा प्रकल्प (Sustainable Urban Transport Project) | २३५.७० |
| | एकूण | | २३५.७० |

E: UD-33/PCMC CDP/07-08/CR 144-11sutp GR lwp

०२. • पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने सदर निधीचा वापर प्रकल्प करारानुसार (Project Agreement) ज्या कारणास्तव निधी मंजूर झाला आहे त्याच प्रयोजनाकरीता करणे बंधनकारक आहे. पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने सदर रक्कमांची व त्यावरील देय व्याजाची केंद्र शासनाच्या मागणीनुसार वेळोवेळी परतफेड राज्य शासनामार्फत करणे बंधनकारक राहील. तसेच वितरित केलेल्या रक्कमांचे विनियोग प्रमाणपत्र दिल्यानंतरच सदर योजनेअंतर्गत पुढील हिस्सा वितरित करण्यात येईल.

०३. पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने दर तीन महिन्यांनी उक्त रक्कमांच्या विनियोगाबाबतचा अहवाल राज्य शासन तसेच, केंद्र शासनास सादर करावा. अशाप्रकारे तिमाही अहवाल सादर करण्यास विलंब झाल्यास त्यांना पुढील हिस्सा प्रलंबित विनियोग अहवाल प्राप्त होईपर्यन्त वितरित करण्यात येणार नाही.

०४. प्रस्तुत योजनेअंतर्गत सर्व प्रकल्पांची अंमलबजावणी पूर्ण झाल्यानंतर या योजनेमधून काय साध्य झाले याबाबतचा अहवाल महानगरपालिकेने राज्य शासन व केंद्र शासनास सादर करावा.

०५. पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेस देण्यात येणा-या रुपये **रुपये दोन कोटी,पस्तीस लाख, सत्तर हजार फक्त ( रु.२,३५,७०,०००/- फक्त)** इतक्या कर्जाच्या रकमेचा खर्च हा मागणी क्र. एफ-७, ६२१७, नगर विकाससाठी कर्जे, ०३, लहान व मध्यम शहरांचा एकात्मिक विकास, १९१, महानगरपालिकांना विकास विषयक बांधकामासाठी कर्जे,(००)(०२) जागतिक बँक व जीईएफ(ग्लोबल एन्व्हॉयरमेंट फॅसिलिटी) यांच्याकडून नागरी वाहतूक सुधारणा प्रकल्पाकरीता पुणे व पिंपरी चिंचवड महानगरपालिकांना कर्ज (६२१७ ०६९९) दत्तमत (योजनांतर्गत)५५, कर्ज व आगाऊ रकमा," या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या चालू आर्थिक वर्षी पुरवणी मागणीद्वारे मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

०६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१४/व्यय-३, दिनांक ३०/०४/२०११ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतिक क्रमांक २०११०५१२१३४२१०००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( रा. वि. कुलकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति --**

१) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-१ , मुंबई
२) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)- २ , मुंबई
३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५) प्रधान सचिव, वित्त / प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका
७) रोखशाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सह सचिव (नवि- ४) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (नवि-३३).

**सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात**
**जागतिक बँक व ग्लोबल एन्व्हॉयरमेंट फॅसिलिटी अर्थसहाय्यित नागरी वाहतूक सुधारणा प्रकल्पासाठी (Sustainable Urban Transport Project) पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेस कर्ज स्वरुपात निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ९ जून,२०११.**

## शुध्दीपत्रक

**संदर्भः शासन निर्णय क्र. एसयुटी-२०११/प्रक्र-१४४/नवि-३३,दिनांक : १२ मे,२०११.**

संदर्भाधिन दिनांक १२ मे,२०११ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक (५) मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :

| परिच्छेद क्रमांक | ऐवजी | वाचावे |
|---|---|---|
| (५) | पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेस देण्यात येणा-या रुपये रुपये दोन कोटी,पस्तीस लाख, सत्तर हजार फक्त ( रु.२,३५,७०,०००/- फक्त) इतक्या कर्जाच्या रकमेचा खर्च हा मागणी क्र. एफ-७, ६२१७, नगर विकाससाठी कर्जे, ०३, लहान व मध्यम शहरांचा एकात्मिक विकास, १९१, महानगरपालिकांना विकास विषयक बांधकामासाठी कर्जे,(००)(०२) जागतिक बँक व जीईएफ(ग्लोबल एन्व्हॉयरमेंट फॅसिलिटी) यांच्याकडून नागरी वाहतूक सुधारणा प्रकल्पाकरीता पुणे व पिंपरी चिंचवड महानगरपालिकांना कर्ज (६२१७ ०६९९) दत्तमत (योजनांतर्गत)५५, कर्ज व आगाऊ रकमा," या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या चालू आर्थिक वर्षी पुरवणी मागणीद्वारे मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. | पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेस देण्यात येणा-या रुपये रुपये दोन कोटी,पस्तीस लाख, सत्तर हजार फक्त ( रु.२,३५,७०,०००/- फक्त) इतक्या कर्जाच्या रकमेचा खर्च हा मागणी क्र. एफ-७, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे, ०३, लहान व मध्यम शहरांचा एकात्मिक विकास, १९१, महानगरपालिकांना सहाय्य (००)(००)(०२) जागतिक बँक व जागतिक पर्यावरण सुविधा याअंतर्गत कायमस्वरुपी नागरी परिवहन प्रकल्पाकरिता पुणे आणि पिंपरी-चिंचवड महानगरपालिकांना कर्जे (६२१७ ०६९९) ५५, कर्ज व आगाऊ रकमा," या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या चालू आर्थिक वर्षी ~~पुरवणी मागणीद्वा~~रे मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा |

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

( रा. वि. कुलकर्णी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति --
१) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-१ , मुंबई
२) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)- २ , मुंबई
३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
५) प्रधान सचिव, वित्त / प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका
७) रोखशाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सह सचिव (नवि- ३३ / ४) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (नवि-३३).
१०) संगणक कक्ष, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई